केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान, सन २०१७-१८ मध्ये राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.राफअ/२०१७/प्र.क्र. ११५ /९अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १९ जून, २०१७**

**संदर्भ :** १) केंद्र शासनाच्या कृषि , सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. F.No.१८-१/२०१७-MIDH, दि.१८.४.२०१७.
२) केंद्र शासनाच्या कृषि , सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. F.No.३३-१७/२०१७-MIDH (APP), दि.२१.०४.२०१७.
३) केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे ई-मेल पत्र. दि.१९.०५.२०१७,
४) शासन निर्णय, कृषि व पदूम विभाग क्र.एमआयडीएच/२०१४/प्र.क्र.८२/भाग-१/९-अे, दि.२४.०३.२०१७.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिनांक.१ एप्रिल **२०१४** पासून कॅबिनेट कमिटी ऑन इकॉनोमिक्स अफेअर्स च्या शिफारशीनुसार संपूर्ण देशात राष्ट्रीय फलोत्पादन अभियान (**NHM**)**,** उत्तर पूर्व आणि हिमालयीन राज्यासाठी फळबाग अभियान(**HMNEH**)**,** राष्ट्रीय बागवानी मंडळ (**NHB**)**,** नारळ विकास मंडळ(**CDB**) व केंद्रीय फलोत्पादन संस्था(**CIH**) या सर्व योजनांचे एकत्रिकरण करुन एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (**Mission for Integrated Development of Horticulture**) राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

त्यानुसार राज्यात राबविला जाणा-या राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाचा समावेश एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानात झालेला आहे.सदर अभियान केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजनेमध्ये समाविष्ट करण्यात आले आहे. सदर योजना सन **२०१५-१६** पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. सदर योजना राज्यात सन २०१७-१८ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन आता पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ मध्ये राज्यात, कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानातंर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी रु.१४८.२९ कोटी निधीचा नविन वार्षिक कृती आराखडा व सन २०१६-१७ मधील रू.५६.८२ कोटी निधीचा शिल्लक (स्पिल ओव्हर) कामांचा कृती आराखडा राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**प्रस्तुत योजनेचे उद्दीष्ट व कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील :-**

१. कृषि उन्नती योजना- एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान ही केंद्र शासनाच्या फलोत्पादन विभागाच्या सर्वंकष विकासाची योजना असून यामध्ये फलोत्पादन विभागातील फळे, फुले, भाजीपाला, कंदवर्गीय पिके, मशरुम, मसाला पिके, नारळ, काजू व कोको अशा बहुविध पिकांचा समावेश आहे. सदर योजनेसाठी केंद्र शासनाकडून ६० टक्के निधी व राज्य शासनाचा ४० टक्के निधी असा एकूण १०० टक्के निधी उपलब्ध होईल. सदर योजनेच्या लार्भार्थ्यांमध्ये सर्वसाधारण गट, अनुसुचित जाती व अनुसुचित जमाती यांचा समावेश राहील.

२. कृषि उन्नती योजना -एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविणेसाठी महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे हे **अंमलबजावणी यंत्रणा** म्हणून कार्यान्वित राहील. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार व वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करण्यात येईल.

**अभियान उद्दीष्टये :-**

२.१ वैविध्य पूर्ण कृषि हवामान विभागानुसार प्रादेशिक अनुकुलता व गरजा लक्षात घेऊन त्या-त्या प्रदेशातील फलोत्पादन क्षेत्राचा संशोधन, तंत्रज्ञान प्रसार, विस्तार, काढणीत्तोर तंत्रज्ञान, प्रक्रिया व पणन सुविधा यांच्या माध्यमातून समुह पध्दतीने सर्वांगिण विकास करणे.

२.२ एफ.आय.जी. (शेतकरी उत्पादक गट)/एफ.पी.ओ (शेतकरी उत्पादक संस्था ) /एफ.पी.सी.(शेतकरी उत्पादक कंपनी ) मार्फत शेतक-यांचे एकत्रिकरण करणे व त्याद्वारे त्यांचा आर्थिक विकास साधणे.

२.३ फलोत्पादन उत्पादनात व शेतक-यांच्या उत्पन्नामध्ये वृध्दी व आहार विषयक सुरक्षा बळकट करणे.

२.४ गुणवत्ता पूर्ण लागवड साहित्य व सुक्ष्म सिंचनाद्वारे पाण्याचा योग्य वापर करुन उत्पादकता वाढविणे.

२.५ कुशल मनुष्यबळ निर्मितीद्वारे ग्रामीण भागातील युवकांसाठी फलोत्पादन व काढणीत्तोर व्यवस्थापन विशेषत: शितसाखळी क्षेत्रामध्ये रोजगार निर्मिती करणे.

**३. अभियान धोरण :**

अभियानाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी खालीलप्रमाणे धोरण अवलंबिण्यात येईल.

३.१ उत्पादक ते अंतिम उपभोक्तापर्यंत फलोत्पादनाच्या विनियोगासाठी उत्पादन पूर्व, उत्पादन, काढणीत्तोर व्यवस्थापन, प्रक्रिया व पणन यामध्ये साखळी निर्माण करुन उत्पादकांना अधिकाधिक मोबदला मिळेल याची खात्री करणे.

३.२ संशोधन आणि विकासाच्या माध्यमातून तंत्रज्ञान विकसीत करुन उत्पादन, काढणीत्तोर व्यवस्थापन, प्रक्रिया विशेषत: शितसाखळीद्वारे नाशवंत मालाची साठवण क्षमता वाढविणे.

३.३ गुणवत्तावाढीच्या खालील माध्यमाद्वारे उत्पादकता वाढविणे :-

अ) पारंपारिक पिकपध्दतीमध्ये फेरबदल करुन फळबागा, द्राक्षमळे, फुले आणि भाजीपाला मळे यांचेकडे अधिकाधिक लक्ष पुरविणे.

ब) उच्च तंत्रज्ञानाचे फलोत्पादन विशेषत: नियंत्रित शेती व शाश्वत शेती याबाबत योग्य तंत्रज्ञानाचा प्रसार शेतक-यांपर्यंत पोहोचविणे.

३.४ काढणीत्तोर व्यवस्थापन प्रक्रिया, मुल्यवर्धित प्रक्रिया व पणन सुविधा यांच्यामध्ये सुधारणा करणे.

३.५ राष्ट्रीय, प्रादेशिक, राज्य व पोटराज्य स्तरावर भागीदारी, एककेंद्रभिमुखता, संशोधन व विकास, प्रक्रिया व विपणन, सार्वजनिक तसेच खाजगी संस्था यांच्यातील समन्वयासाठी प्रोत्साहन यासाठी समन्वयीत दृष्टीकोनाचा अवलंब करणे.

३.६ शेतक-यांना पुरेसा परतावा मिळणेसाठी शेतकरी उत्पादक संघ, पणन संघ/संघटक व आर्थिक संस्था यांच्यामध्ये समन्वय प्रस्थापित करणे.

३.७ कृषि महाविद्यालये, विद्यापीठे, माहिती तंत्रज्ञान, तंत्रनिकेतन इ.स्तरावर अभ्यास क्रमातील सुयोग्य बदल मनुष्यबळ विकास कार्यक्रम व क्षमतावर्धन योजना अंमलबजावणीत आणणेसाठी आवश्यक ती कार्यवाही करणे.

४. <u>अभियान रचना - राज्यस्तर</u>.

४.१ <u>राज्यस्तरीय कार्यकारी समिती :-</u>

कृषि उन्नती योजना - एकात्मिक फलोत्पादन विकास योजनेसाठी राज्यपातळीवर खालीलप्रमाणे कार्यकारी समिती कार्यरत राहील.

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (कृषि ) मंत्रालय, मुंबई | **अध्यक्ष** |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई | **सदस्य** |
| ३ | अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई | **सदस्य** |
| ४ | मिशन डायरेक्टर, एमआयडीएच,भारत सरकार प्रतिनिधी | **सदस्य** |
| ५ | आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे | **सदस्य** |
| ६ | उपसचिव/सहसचिव, फलोत्पादन, मंत्रालय, मुंबई-३२ | **सदस्य** |
| ७ | संचालक, राष्ट्रीय डाळींब संशोधन केंद्र, सोलापूर | **सदस्य** |
| ८ | संचालक, राष्ट्रीय द्राक्ष संशोधन केंद्र, मांजरी, पुणे | **सदस्य** |
| ९ | संचालक, राष्ट्रीय संत्रा संशोधन केंद्र, नागपूर | **सदस्य** |
| १० | संचालक, राष्ट्रीय कांदा लसूण संशोधन केंद्र, राजगुरुनगर, जि. पुणे | **सदस्य** |
| ११ | विभाग प्रमुख, फलोत्पादन, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी | **सदस्य** |
| १२ | विभाग प्रमुख, फलोत्पादन, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली | **सदस्य** |
| १३ | विभाग प्रमुख, फलोत्पादन, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | **सदस्य** |
| १४ | विभाग प्रमुख, फलोत्पादन, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | **सदस्य** |
| १५ | फळे, भाजीपाला व फुले उत्पादन संघाचे प्रतिनिधी/शेतकरी उत्पादक संस्थेचे प्रतिनिधी (FPO) प्रत्येकी एक ★ | **सदस्य** |
| १६ | संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे | **सदस्य** |
| १७ | प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर यांचे प्रतिनिधी | **सदस्य** |
| १८ | संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | **सदस्य** |
| १९ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | **सदस्य सचिव** |

★फळे/फुले उत्पादन संघाचे व शेतकरी उत्पादक संस्थेच्या प्रतिनिधींच्या नियुक्तीचे अधिकार समितीचे अध्यक्ष व सदस्य सचिव यांना राहतील.

**५. राज्यस्तरीय कार्यकारी समितीची कार्यपध्दती :**

५.१ अभियानाच्या ध्येय व धोरणानुसार टेक्नीकल सपोर्ट ग्रुप, कृषि विद्यापीठे व भारतीय कृषि अनुसंधान संस्थांच्या सहाय्याने राज्यस्तरीय वार्षिक कृति आराखडा तयार करणे.

५.२ कार्यकारी समितीला प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेतील प्रकल्प आधारित प्रस्तावांना मान्यता देणे व प्रदान आर्थिक मर्यादेपुढील रकमेचे प्रस्ताव केंद्र स्तरावरील कार्यकारी समिती (ई.सी.) व विशेष अधिकार समिती (ई.एम.सी.) यांचे मान्यतेसाठी शिफारस करणे.

५.३ जिल्हा, तालुका व गाव पातळीवर राबविण्यात आलेल्या पीक समुहनिहाय (Cluster) योजनांचे तसेच, इतर घटकांचेही पायाभूत सर्व्हेक्षण करणे.

५.४ केंद्र व राज्य स्तरावरुन तसेच इतर संस्थाकडून निधी प्राप्त करुन घेऊन प्राप्त निधीचे हिशोब योग्यरित्या ठेवणे. प्राप्त रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित यंत्रणेस पाठविणे.

५.५ आर्थिक संस्थांच्या माध्यमातून शेतक-यांची आर्थिक गरज भागविणेसाठी शेतकरी उत्पादक संघटना / शेतकरी उत्पादक कंपनी यांचे निर्मितीच्या प्रगतीचा आढावा घेणे.

५.६ योजना राबविणा-या संस्थांना/कार्यालयांना निधी वितरीत करणे, झालेल्या कामकाजाच्या प्रगतीचा आढावा घेणे.

५.७ राज्यातील शेतकरी, सोसायटी, उत्पादक संस्था, एकत्रित समुह, स्व-मदत गट, राज्यस्तरीय संस्था व इतर संबंधित संस्था यांचेमार्फत राबविण्यात येत असलेल्या योजनांच्या प्रगतीचा आढावा घेणे.

५.८ राज्यातील कृषि विद्यापीठे, भारतीय कृषि अनुसंधान संस्थेच्या राज्यातील विविध संस्था, कृषि विज्ञान केंद्रे व इतर संबंधीत संस्थांच्या सहाय्याने राष्ट्रीय, राज्य व जिल्हास्तरावर विविध कार्यशाळा, प्रशिक्षण वर्ग, व प्रदर्शने आयोजित करणे.

५.९ योजनेचा मासिक प्रगती अहवाल जिल्हा स्तरावरुन प्राप्त करुन घेऊन, राज्याचा एकत्रित मासिक प्रगती अहवाल दरमहा केंद्र शासनाचे कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागास पाठविणे. तसेच, संकेतस्थळावर दरमहिन्याचे ५ तारखेस राज्य व जिल्हास्तरावरुन संगणकीय पध्दतीद्वारे अदयावत करणे.

५.१० हॉर्टनेटच्या माध्यमातून तळागाळातील पातळीवर माहिती संप्रेषण तंत्रज्ञान सक्षम व्यवस्थापन प्रणालीद्वारे पोहोचविणे.

५.११ जिल्हापरिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत या पंचायत राज संस्थांना सहभागी करुन घेणे.

## ६. जिल्हास्तर :

प्रत्येक जिल्ह्यासाठी जिल्हास्तरावर प्रकल्पाची आखणी करणे, राज्यस्तरीय मंडळाकडे शिफारस करणे, मंजुरीनुसार अंमलबजावणी व सनियंत्रण करणे याकरिता खालीलप्रमाणे जिल्हा अभियान समिती स्थापित करण्यात यावी.

**जिल्हा अभियान समिती**

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | **अध्यक्ष** |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | **सदस्य** |
| ३ | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्राम विकास यंत्रणा | **सदस्य** |
| ४ | जिल्हा पणन अधिकारी | **सदस्य** |
| ५ | प्रकल्प संचालक (आत्मा) / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | **सदस्य** |
| ६ | व्यवस्थापक जिल्हा अग्रणी बँक | **सदस्य** |
| ७ | जिल्हा विकास प्रबंधक, नाबार्ड | **सदस्य** |
| ८ | जिल्हास्तरीय फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी ★ | **सदस्य** |
| ९ | स्वयंसहाय्य गट प्रतिनिधी. ★ | **सदस्य** |
| १० | अशासकीय संस्था प्रतिनिधी ★ | **सदस्य** |
| ११ | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी /प्रकल्प संचालक (आत्मा) | **सदस्य सचिव** |

★ येथिल प्रतिनिधींच्या नियुक्तीचे अधिकार समितीचे अध्यक्ष व सदस्य सचिव यांना राहतील.

**७. तांत्रिक सहाय्यता गट :**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनाप्रमाणे राज्यस्तरावर एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानासाठी तांत्रिक सहाय्यता गटाची स्थापना करण्यात यावी.सदर तांत्रिक सहाय्यता गटाने प्रकल्प तयार करणे, मुल्यमापन व समवर्ती मुल्यमापनाचे सनियंत्रण ही कामे करावीत.

**८. एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाची मान्यता व अंमलबजावणीसाठी कार्यपध्दती :**

८.१ फळबागांच्या सर्वांगिण विकासासाठी १२ व्या पंचवार्षिक योजनेच्या काळात लक्ष्य साध्य करण्यासाठी राज्य सरकार निश्चित दृष्टीकोन /धोरणात्मक योजना तयार करेल. हा दृष्टीकोन वार्षिक कृति आराखडा तयार करण्यासाठी आधार म्हणून वापरण्यात यावा. राज्यातील प्रत्येक जिल्हयामध्ये उद्दीष्ट साध्य करण्यासाठी भौगोलीक आणि हवामान माहिती, फळबागांच्या विकासाची क्षमता, जमिन उपलब्धता SWOC, विश्लेषण, कृति आराखडा आणि योजनेसाठी धोरणात्मक निर्णय इत्यादींचा समावेश राज्य आपल्या धोरणात्मक योजनेमध्ये करेल. या योजनेतील दस्त ऐवजांमध्ये विशेषत: ज्या ठिकाणचा तुलनात्मक फायदा आणि नैसर्गिक विकासाची क्षमता राज्यामध्ये आहे, अशा पिकांचा समावेश करेल. काढणीत्तोर व्यवस्थापन, प्रक्रीया , विपणन आणि निर्यात वाढीकरीता चालना देण्यासाठी, उपलब्ध साधनसामुग्री, पिकसमूह दृष्टीकोनाचा अवलंब करण्यात यावा. पिकसमूह निवड करताना पाणलोट विकास कार्यक्रम, राष्ट्रीय कृषि विकास योजना, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना इत्यादीद्वारे राज्यातील ज्या भागामध्ये नैसर्गिक स्त्रोत व जलसंपत्तीचा विकास झाला आहे अशा भागामध्ये अग्रकम देण्यात यावा. तसेच वर्तमान व भविष्यातील गरजा भागविण्याची क्षमता असलेल्या पिकांना अग्रक्रम देण्यात यावा.

८.२ वार्षिक कृति आराखडा :

वार्षिक कृति आराखडयामध्ये गत अभियानातर्गत विविध घटकांतील फलितांचा समावेश असेल जसे की, क्षेत्रविस्तार, (विविध नवनिर्मित जाती, उत्पादकतेतील वाढ, पिकसमुहांचे झालेली निर्मिती), गरजेनुसार जलसंपत्तीचा झालेला विकास (सिंचन क्षमतेतील वाढ जी सुक्ष्म सिंचनशी संलग्न केली आहे, देखभाल इत्यादी) क्षेत्रविस्तार हा घटक लागवड साहित्याची आणि बियाणे/वाणांची उपलब्धता यांच्यावर आधारीत असून त्याचा स्वतंत्रपणे वार्षिक कृती आराखडयामध्ये समावेश करण्यात यावा.

८.३ कृषि मंत्रालयामार्फत प्रत्येक राज्याला संभाव्य वार्षिक नियतव्यय कळविण्यात येईल. ज्यामध्ये प्रत्येक जिल्हानिहाय/विभागनिहाय नियतव्यय असेल. जिल्हास्तरीय यंत्रणेने त्यांच्या विकासाच्या अग्रक्रमाच्या क्षमतेनुसार राज्यस्तरीय यंत्रणेला वार्षिक कृति आराखडा तयार करुन सादर करावा. राज्यस्तरीय यंत्रणा तांत्रिक सहाय्यता गट/तांत्रिक सल्लागार यांच्या सेवा, वार्षिक कृति आराखडा अधिक प्रभावीपणे तयार करणेसाठी उपलब्ध करुन घेण्यात याव्यात. राज्यस्तरीय फलोत्पादन अभियान अंमलबजावणी यंत्रणेने, राज्याचा एकत्रित प्रस्ताव तयार करुन राज्यस्तरीय कार्यकारी समितीस सादर करावा.सदर प्रस्तावाची राज्यस्तरीय समितीकडून तपासणी झाल्यानंतर त्याची एक प्रत कृषि मंत्रालय,भारत सरकार यांना राष्ट्रीय कार्यकारी समितीच्या मान्यतेसाठी सादर करावी. फलोत्पादन विकास, उत्पादन, काढणीत्तोर व्यवस्थापन आणि पणन या बाबी राज्यस्तरीय फलोत्पादन अभियानाच्या अंतर्गत येतील.

९. <u>निधी वितरण व्यवस्था</u>

९.१ केंद्र शासनाकडून राज्य शासनास निधी वितरीत करण्यात येईल. राज्य शासन सदर निधी योजनेच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांना वितरित करेल. महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांनी सदर निधीचे वितरण जिल्हा अंमलबजावणी यंत्रणेस करावे. ज्या घटकांच्या बाबतीत हॉर्टनेट संगणक प्रणाली विकसीत करण्यात आली आहे, अशा घटकांचे वैयक्तिक लाभार्थींस देय अनुदान, हॉर्टनेट संगणक प्रणालीद्वारे करण्यात यावे. इतर घटकांच्या बाबतीत जिल्हा अंमलबजावणी यंत्रणेने,पात्र लाभार्थ्यांना देय अनुदान थेट बँकेमार्फत त्यांच्या बँक खात्यामध्ये (आर.टी.जी.एस.द्वारे) वितरीत करावे.

९.२ जिल्हा अंमलबजावणी यंत्रणेने, त्यांना वितरीत केलेल्या घटकनिहाय अनुदानाच्या मर्यादेत कामे घ्यावीत.

९.३ सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पीत निधी सर्वसाधारण,अनुसूचित जाती व अनुसूचित जनजाती प्रवर्गासाठी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| **प्रवर्ग** | **केंद्र हिस्सा ६० टक्के** | **राज्य हिस्सा ४० टक्के** |
|---|---|---|
| सर्वसाधारण | **मागणी क्र. - डी -०३**<br>**२४०१ - पीक संवर्धन**<br>(००)(११९) - बागायती व भाजीपाला पिके<br>(११९) (०३) - रोपमळे<br>(०३) (३७) - कृषि उन्नती योजना **-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (कें.पु.यो.)**<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (सर्वसाधारण)<br>३३-अर्थसहाय्य<br>(२४०१ ९५६३) | **मागणी क्र. - डी -०३**<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००)(११९) - बागायती व भाजीपाला पिके<br>११९ (०३) - रोपमळे<br>(०३) (३४) - कृषि उन्नती योजना -एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान **(कें.पु.यो.)**<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (सर्वसाधारण)<br>३३ - अर्थसहाय्य<br>(२४०१ ४५०७) |
| अनुसूचित जाती | **मागणी क्र. - डी -०३**<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००)(७८९) - अनुसूचित जाती उपयोजना<br>(०३) रोपमळे<br>(०३) (०१) -कृषि उन्नती योजना- **एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान** (अनुसूचित जाती) **(कें.पु.यो.) (केंद्र** हिस्सा ६० टक्के)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A१२७) | **मागणी क्र. - डी -०३**<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७८९) - अनुसूचित जाती उपयोजना<br>(०३) रोपमळे<br>(०३) (०२) - कृषि उन्नती योजना -एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जाती ) **(कें.पु.यो.)** (राज्य हिस्सा ४० टक्के)<br>३३ -अर्थसहाय्य (२४०१A१३६) |
| अनुसूचित जनजाती | मागणी क्र.टी - ५,<br>२४०१- पिक संवर्धन<br>७९६-अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना<br>(०१) (०६) कृषि उन्नती योजना - एकत्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जनजाती)<br>**(कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा,६० टक्के)**<br>३३ अर्थसहाय्य (२४०१A०२९) | मागणी क्र.टी - ५,<br>२४०१- पिक संवर्धन<br>७९६-अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना अंतर्गत योजना<br>(०१) (०७) कृषि उन्नती योजना-एकत्मिक फलोत्पादन विकास अभियान (अनुसूचित जनजाती)<br>**(कें.पु.यो.) (राज्य हिस्सा, ४० टक्के)**<br>३३ अर्थसहाय्य (२४०१A०११) |

९.४ सदर योजनेच्या अंमल बजावणी करीता, जिल्हा अभियान समितीने मंजूर केलेल्या प्रस्तावांना देय अनुदान वितरीत करण्यासाठी, संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना व राज्यस्तरीय कार्यकारी समिती आणि एमपॉवर्ड मॉनिटरींग कमिटी (EMC) याव्दारे मंजूरी प्राप्त होणाऱ्या प्रकल्प आधारीत घटकांचे, देय अनुदान वितरीत करण्यासाठी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे कार्यालयातील लेखाधिकारी, वर्ग - २ यांना, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**<u>१०. अभियान व्यवस्थापन कामकाजासाठी निधी उपलब्धता :</u>**

एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानअंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी, राज्य स्तरीय व मंडळ कार्यालयातील तसेच जिल्हा स्तरावरील कार्यालयातील प्रशासकीय खर्च , सल्लागार, संगणकीकरण, आकस्मित खर्च इत्यादीसाठी, योजनेवरील खर्चाचे ५ टक्के प्रमाणात निधीचा वापर करणेत येईल. व्यवस्थापन निधीसाठी आवश्यक असणारी तरतूद, वार्षिक कृती आराखडयात करण्यात यावी.

**११.** प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ -३ दि.१८ एप्रिल, २०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहेत.

**१२.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२०१५१६५९०९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamlakar
Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.06.20 15:13:24 +05'30'

**( क.य.वंजारे )**
शासनाचे उपसचिव,

**प्रती :-**

१. मा.मुख्यमंत्री , महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. मा. मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२,
३. मा. राज्यमंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२,
४. सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद सदस्य,महाराष्ट्र राज्य.
५. मा.प्रधान सचिव, (कृषि व पणन) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,
६. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ,३२
७. मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, नियोजन विभाग/आदिवासी विकास विभाग/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई ,३२
८. कुलगुरू, राज्यातील सर्व कृषि विद्यापिठे.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर.
१०. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. राज्यातील सर्व जिल्हा अधिकारी.

१२. व्यवस्थापकीय संचालक, नाबार्ड, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१३. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,साखर संकुल,शिवाजी नगर,पुणे,
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे,
१५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१६. राज्यातील सर्व विभागीय कृषि सह संचालक,
१७. राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१८. राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
१९. निवडनस्ती, कार्यासन -९अे.